**मा.सर्वोच्च न्यायालयाने सिव्हिल अपील क्रमांक ८९२८/२०१५ व इतर याचिकांमध्ये दिनांक ६ जुलै, २०१७ रोजी दिलेल्या निर्णयाच्या अनुषंगाने अधिसंख्य पदावर नियुक्ती देण्यात आलेल्या नागरी संरक्षण संचालनालयातील अधिकारी/ कर्मचारी यांचे तांत्रिक खंड क्षमापित करण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## गृह विभाग

**क्र.सीडीएम-२०२०/प्र.क्र.१०७/विशा-८,**

१२ वा मजला, नविन प्रशासकीय भवन, मादाम कामा मार्ग,
हुतात्मा राजगुरु चौक, मंत्रालय, मुंबई ४०००३२

**दिनांक : २५ मार्च, २०२५.**

**वाचा :-**
१) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.बीसीसी-२०१८/प्र.क्र.३०८/१६-ब, दि.२१.१२.२०१९.
२) शासन निर्णय, गृह विभाग, क्र.सीडीएम-२०२०/प्र.क्र.१०७/विशा-८, दि.२५.०६.२०२१.
३) शासन निर्णय, गृह विभाग, क्र.सीडीएम-२०२१/प्र.क्र.५८/विशा-८, दि.२५.०६.२०२१.
४) वरिष्ठ प्रशासिक अधिकारी (प्र. व धो.), नागरी संरक्षण संचालनालय, मुंबई यांचे आदेश क्र.नासंस/कार्या-२(२)/प्र.क्र.२(खंड-२)/२०२१/६१३, दि.२२.७.२०२१.
५) वरिष्ठ प्रशासिक अधिकारी (प्र. व धो.), नागरी संरक्षण संचालनालय, मुंबई यांचे आदेश क्र.नासंस/कार्या-२(२)/प्र.क्र.२(खंड-२)/२०२१/६१४, दि.२२.७.२०२१.
६) वरिष्ठ प्रशासिक अधिकारी (प्र. व धो.), नागरी संरक्षण संचालनालय, मुंबई यांचे आदेश क्र.नासंस/कार्या-२(२)/प्र.क्र.२(खंड-२)/२०२१/६१५, दि.२२.७.२०२१.
७) वरिष्ठ प्रशासिक अधिकारी (प्र. व धो.), नागरी संरक्षण संचालनालय, मुंबई यांचे आदेश क्र.नासंस/कार्या-२(२)/प्र.क्र.२(खंड-२)/२०२२/५९९, दि.०१.०७.२०२२.
८) वरिष्ठ प्रशासिक अधिकारी (प्र. व धो.), नागरी संरक्षण संचालनालय, मुंबई यांचे आदेश क्र.नासंस/कार्या-२(२)/अधिसंख्य पद/२०२३/५३७, दि.२३.५.२०२३.
९) वरिष्ठ प्रशासिक अधिकारी (प्र. व धो.), नागरी संरक्षण संचालनालय, मुंबई यांचे आदेश क्र.नासंस/कार्या-२(२)/अधिसंख्य पद/२०२४/३९९, दि.०८.४.२०२४.
१०) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्र.बीसीसी-११२३/प्र.क्र.२९/आरक्षण-२, दि.०४.१०.२०२४.
११) वरिष्ठ प्रशासिक अधिकारी (प्र. व धो.), नागरी संरक्षण संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र.नासंस/कार्या-२(२)/अधिसंख्य पद/प्रक.क्र.१९९/२०२५/१७१, दि.१०.०२.२०२५
१२) वरिष्ठ प्रशासिक अधिकारी (प्र. व धो.), नागरी संरक्षण संचालनालय, मुंबई यांचे पत्र क्र.नासंस/कार्या-२(२)/अधिसंख्य पद/प्रक.क्र.१९९/२०२५/२६१, दि.०७.३.२०२५

**प्रस्तावना :-**

मा. सर्वोच्च न्यायालयाने सिव्हिल अपील क्र.८९२८/२०१५ व इतर यामध्ये दिनांक ०६.०७.२०१७ रोजी दिलेल्या निर्णयाच्या अनुषंगाने अनुसूचित जमातीचे जात प्रमाणपत्र अवैध ठरलेल्या कर्मचाऱ्यांना अधिसंख्य पदावर वर्ग करण्याबाबतची कार्यवाही संदर्भ क्र.१ च्या शासन निर्णयान्वये विहित करण्यात आली आहे. त्यानुषंगाने संदर्भ क्र.२ व ३ अन्वये, गृह विभागाच्या अधिपत्याखालील नागरी संरक्षण संचालनालयातील अनुसूचित जमाती प्रवर्गातून नियुक्त झालेल्या तथापि जात प्रमाणपत्र अवैध ठरल्यामुळे सेवा समाप्त केलेल्या एकूण ०३ अधिकारी/कर्मचाऱ्यांसाठी अधिसंख्य पदे निर्माण करुन, उक्त

कर्मचाऱ्यांना तात्पुरत्या स्वरुपात ११ महिन्याकरिता किंवा ते सेवेत राहिले असते तर ते ज्या दिनांकाला सेवानिवृत्त झाले असते त्या दिनांकापर्यंत यापैकी जे आधी घडेल तोपर्यंत उक्त अधिसंख्य पदांवर नेमणूक देण्यात आलेली आहे. त्यानुसार, नागरी संरक्षण संचालनालयाच्या संदर्भ क्र.४, ५ व ६ येथील दि.२२.०७.२०२१ च्या आदेशान्वये उक्त कर्मचाऱ्यांना अधिसंख्य पदांवर नियुक्ती देण्यात आलेली आहे. तसेच, संचालनालयाच्या संदर्भ क्र.७, ८ व ९ येथील आदेशांन्वये उक्त कर्मचाऱ्यांना वेळोवेळी १ दिवसाचा तांत्रिक खंड देवून पुढील ११ महिन्यांच्या कालावधीकरिता किंवा ते सेवेत राहिले असते तर ते ज्या दिनांकाला सेवानिवृत्त झाले असते त्या दिनांकापर्यंत किंवा अभ्यास गटाच्या शिफारशी शासनास प्राप्त होऊन त्यावर शासनाचा अंतिम निर्णय होईपर्यंत यापैकी जे आधी घडेल तोपर्यंत अधिसंख्य पदावर नियुक्ती देण्यात आली आहे.

सामान्य प्रशासन विभागाच्या संदर्भ क्र.१० येथील शासन निर्णयान्वये, दि.२१.१२.२०१९ च्या शासन निर्णयानुसार अधिसंख्य पदावर वर्ग केलेल्या अधिकारी/कर्मचाऱ्यांचा प्रत्येक ११ महिन्याच्या सेवेनंतरचा १ दिवसाचा तांत्रिक खंड सर्व सेवा विषयक (पदोन्नती व अनुकंपा धोरण वगळून) व सेवानिवृत्ती विषयक लाभांसाठी क्षमापित करण्याबाबत निर्णय घेण्यात आलेला आहे. त्यानुसार, नागरी संरक्षण संघटनेच्या आस्थापनेवरील ०३ अधिकारी/कर्मचाऱ्यांना अधिसंख्य पदावर वर्ग केल्यानंतर त्यांना ११ महिन्यांच्या सेवेनंतर देण्यात आलेले तांत्रिक खंड क्षमापित करण्याबाबत नागरी संरक्षण संचालनालयाने संदर्भ क्र.११ व १२ येथील पत्रान्वये प्रस्ताव सादर केला आहे. त्यानुसार नागरी संरक्षण संचालनालयातील उक्त ०३ अधिकारी/ कर्मचाऱ्यांचे तांत्रिक खंड क्षमापित करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**<u>शासन निर्णय</u> :-**

सामान्य प्रशासन विभागाच्या दि.२१.१२.२०१९ च्या शासन निर्णयानुसार, अनुसूचित जमातीचे जात प्रमाणपत्र अवैध ठरल्यामुळे अधिसंख्य पदावर वर्ग केलेल्या नागरी संरक्षण संचालनालयातील खालील तक्त्यात नमुद एकूण ०३ अधिकारी/कर्मचारी यांना सामान्य प्रशासन विभागाच्या दि.०४.१०.२०२४ रोजीच्या शासन निर्णयामधील तरतुदीनुसार, अधिसंख्य पदावर देण्यात आलेल्या प्रत्येक ११ महिन्याच्या नियुक्तीनंतरचा १ दिवसाचा तांत्रिक खंड सर्व सेवा विषयक (पदोन्नती व अनुकंपा धोरण वगळून) व सेवानिवृत्ती विषयक लाभांसाठी क्षमापित करण्यात येत आहे.

| अ. क्र. | अधिकारी/ कर्मचाऱ्याचे नाव व पदनाम | नियुक्ती दिनांक | सेवानिवृत्ती दिनांक | ११ महिन्यांच्या नियुक्तीचा कालावधी | तांत्रिक खंड (दिनांक) | तांत्रिक खंडाचा कालावधी (दिवस) |
|---|---|---|---|---|---|---|
| १ | श्री.श.भा.शिरसाठ, सहाय्यक उपनियंत्रक | १९.७.२००२ | ३०.४.२०३२ | २२.७.२०२१ ते २१.६.२०२२ | -- | -- |
| | | | | २२.६.२०२२ ते २१.५.२०२३ | २२.५.२०२३ | ०१ |
| | | | | २३.५.२०२३ ते २२.४.२०२४ | २३.४.२०२४ | ०१ |
| | | | | २४.४.२०२४ ते २३.३.२०२५ | | |
| २ | श्री.दे.जा.कोळी, प्रयोग निदेशक | ०२.३.२००१ | ३१.१२.२०२८ | २२.७.२०२१ ते २१.६.२०२२ | -- | -- |
| | | | | २२.६.२०२२ ते २१.५.२०२३ | २२.५.२०२३ | ०१ |
| | | | | २३.५.२०२३ ते २२.४.२०२४ | २३.४.२०२४ | ०१ |
| | | | | २४.४.२०२४ ते २३.३.२०२५ | | |

| | | | | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| ३ | श्री.लि.रा.भगत, शिपाई | ०१.०२.२००१ | ३१.५.२०२८ | २२.७.२०२१ ते २१.६.२०२२ | -- | -- |
| | | | | २२.६.२०२२ ते २१.५.२०२३ | २२.५.२०२३ | ०१ |
| | | | | २३.५.२०२३ ते २२.४.२०२४ | २३.४.२०२४ | ०१ |
| | | | | २४.४.२०२४ ते २३.३.२०२५ | | |

०२. वरील अधिकारी/कर्मचाऱ्यांना सेवामुक्त केल्यानंतर अधिसंख्य पदावर नियुक्ती देण्यात आलेली असल्याने, या अधिकारी/कर्मचाऱ्यांचा सेवामुक्त केल्याच्या दिनांकापासून अधिसंख्य पदावर पुनर्नियुक्तीपर्यंतचा कालावधी (खंड) महाराष्ट्र नागरी सेवा (निवृत्तीवेतन) नियम, १९८२ अनुसार केवळ निवृत्तीविषयक लाभ मिळणेसाठी क्षमापित करण्यात येत आहे. तथापि, वरील अधिकारी/कर्मचाऱ्यांना सेवामुक्त केल्याच्या दिनांकापासून अधिसंख्य पदावर नियुक्ती करेपर्यंतच्या कालावधीची गणना कोणत्याही सेवा विषयक व सेवानिवृत्ती विषयक लाभांसाठी अर्हताकारी सेवा म्हणून ग्राह्य धरण्यात येणार नाही.

०३. अधिसंख्य पदावरील अधिकारी/कर्मचारी पदोन्नतीस पात्र नसल्याने त्यांना सेवांतर्गत आश्वासित प्रगती योजनेचा लाभ अनुज्ञेय होणार नाही.

०४. नागरी संरक्षण संचालनालयाने संदर्भ क्र.१० येथे नमूद सामान्य प्रशासन विभागाच्या दि.०४.१०.२०२४ रोजीच्या शासन निर्णयातील तरतुदीनुसार तात्काळ कार्यवाही करावी.

०५. उपरोक्त अधिकारी/कर्मचारी हे नागरी संरक्षण संचालनालय, मुंबई यांच्या अधिपत्याखालील कार्यालयात कार्यरत असल्याने त्यांच्या वेतनावर होणारा खर्च त्या कार्यालयाच्या वेतनासंबंधित लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा आणि संबंधित वित्तीय वर्षाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

०४. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२५०३२५१४४६१५९६२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

MINAKSHI
DEVIDAS KARHADE

Digitally signed by MINAKSHI DEVIDAS KARHADE
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=HOME DEPARTMENT,
2.5.4.20=33473ccf07d654375a0e611650799133065370709cb518c396a6b2b3f6c3cda9, postalCode=400032, st=Maharashtra,
serialNumber=64757C0F2E9C5E56362BC8E7A79ABEE993C28EBD3D21BC22D37A4D8E12AD1CB3, cn=MINAKSHI DEVIDAS KARHADE
Date: 2025.03.25 14:47:18 +05'30'

**(मिनाक्षी कऱ्हाडे)**

**कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१. महालेखापाल, (लेखा व अनुज्ञेयता) महाराष्ट्र-१, मुंबई.
२. महालेखापाल, (लेखा परिक्षा) महाराष्ट्र-१, मुंबई.
३. संचालक, नागरी संरक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई
४. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
५. निवासी लेखा परिक्षा अधिकारी, मुंबई
६. सामान्य प्रशासन विभाग (कार्यासन-१६ब), मंत्रालय, मुंबई.
७. वित्त विभाग (कार्यासन आ.पु.क.), मंत्रालय, मुंबई
८. संबंधित अधिकारी/कर्मचारी (संचालक, नागरी संरक्षण, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांच्यामार्फत)
९. निवड नस्ती (विशा-८)